राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान या योजनेसाठी सन २०१७-१८ करीता केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा (एकत्रित) रु.२३२९.६८ लक्ष इतका निधी वितरीत करणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आरएमएसए २०१७/(८५/१७)/एस.डी.६

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: २३ मे, २०१७.

वाचा -

१) **विभागाचा शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण २४१६/(४९/१६)/अर्थसंकल्प, दि. ९.८.२०१६**
२) **वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्र.क्र.७५/अर्थ-३, दिनांक १८.४.२०१७**
३) **मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे दि.२६.४.२०१७ चे पत्र.**

प्रस्तावना -

केंद्र शासनाच्या अकराव्या व बाराव्या पंचवार्षिक योजने अंतर्गत राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान सुरु करण्यात आले असून, सन २०१७ पर्यंत माध्यमिक शिक्षणाचे सार्वत्रिकरण करणे, हे या योजनेचे प्रमुख उद्दिष्ट आहे. राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान योजना ही केंद्र पुरस्कृत योजना असून, या योजनेचे स्वरुप केंद्र हिस्सा ६०% व राज्य हिस्सा ४०% असे आहे. केंद्र शासनाने दि. २६.४.२०१७ च्या आदेशान्वये सदर योजनेसाठी सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाकडून रू. १३९७.८१ लक्ष इतका निधी वितरित केला आहे. सदर योजनेसाठी केंद्र शासनाकडून वितरित करण्यात आलेल्या निधीच्या प्रमाणात राज्य शासनाचा हिस्सा रु. ९३१.८७ लक्ष इतका येतो. केंद्र शासनाकडून प्राप्त रू. १३९७.८१ लक्ष व त्याप्रमाणात राज्या हिस्सा रु. ९३१.८७ लक्ष असा एकूण रु. २३२९.६८ लक्ष निधी राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान योजनेसाठी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियानाची अंमलबजावणी राज्यामध्ये प्रभावीपणे होण्याकरीता सन २०१७-१८ मध्ये केंद्र हिस्सा रु. १३९७.८१ लक्ष व त्याप्रमाणात राज्य हिस्सा रु. ९३१.८७ लक्ष असा एकूण रु. २३२९.६८ लक्ष (अक्षरी रूपये तेवीस कोटी एकोणतीस लक्ष अडुसष्ठ हजार फक्त) निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्र.ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०२ माध्यमिक शिक्षण, ८००, इतर खर्च, पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना (००)(०९) राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान (केंद्र हिस्सा) (२२०२ एच १९६) ३१, सहायक अनुदाने(वेतनेतर) या लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध तरतुदीतून रु. १२२५.०४ लक्ष इतका निधी वितरित करण्यात यावा.

तसेच मागणी क्र.ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०२ माध्यमिक शिक्षण, ८००, इतर खर्च, पंचवार्षिक योजनेंतर्गत योजना (००)(०८) राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान (राज्य हिस्सा) (२२०२ एच१८७) ३१, सहायक अनुदाने(वेतनेतर) या लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध तरतुदीतून रु.८१६.६९ लक्ष इतका निधी वितरित करण्यात यावा.

मागणी क्र.ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०२ माध्यमिक शिक्षण, ७८९, अनुसूचित जाती उपयोजना, (०१)(०३) राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान(अनुसूचित जाती उपयोजना) (केंद्र हिस्सा) (२२०२ आय२८१) ३१, सहायक अनुदाने(वेतनेतर) या लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध तरतुदीतून रु. १७२.७७ लक्ष इतका निधी वितरित करण्यात यावा.

मागणी क्र.ई-२, २२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०२ माध्यमिक शिक्षण, ७८९, अनुसूचित जाती उपयोजना, (०१)(०४) राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान(अनुसूचित जाती उपयोजना) (राज्य हिस्सा) (२२०२ आय२९२) ३१, सहायक अनुदाने(वेतनेतर) या लेखाशीर्षांतर्गत उपलब्ध तरतुदीतून रु. ११५.१८लक्ष इतका निधी वितरित करण्यात यावा.

३. वरील खर्च वित्त विभागाच्या संदर्भाधिन दि.१८.४.२०१७ च्या परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा. यासाठी सहसचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी, तसेच अवर सचिव/कार्यासन अधिकारी(रोखशाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१८.४.२०१७ च्या परिपत्रकास अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची तसेच परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे. परिपत्रकातील परिच्छेद क्र.१८ नुसार केंद्र शासनाचा निधी प्रत्यक्षात प्राप्त झाला असल्याचे अभिप्राय वित्त विभागाच्या अर्थोपाय शाखेने अनौपचारिक संदर्भ क्र.२२४/अर्थोपाय, दि.०४.०५.२०१७ अन्वये दिलेले आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५२३१६३७५४८६२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suvarna S Kharat

Digitally signed by Suvarna S Kharat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School And Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a98fe3e5a45c818668168cffd366aced9a44c59607f616a36d403a80e74d0df, cn=Suvarna S Kharat
Date: 2017.05.23 16:46:02 +05'30'

**(डॉ.सुवर्णा खरात)**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा. मंत्री, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.

२) मा. प्रधान सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग मंत्रालय, मुंबई.
३) मा.आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई.
५) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), पुणे.
६) सहसचिव (प्रशासन), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) सहसंचालक (प्रकल्प), राष्ट्रीय माध्यमिक शिक्षा अभियान, मुंबई.
८) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१ व २ मुंबई/नागपूर.
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ व २ मुंबई/नागपूर.
१०) संचालक, लेखा व कोषागारे, पुणे.
११) वरिष्ठ कोषाधिकारी, जिल्हा पुणे.
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/वांद्रे
१३) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१४) शिक्षणाधिकारी(माध्यमिक), जिल्हा परिषद(सर्व)
१५) वित्त विभाग, (व्यय-५/अर्थसंकल्प शाखा), मंत्रालय, मुंबई.
१६) कार्यासन अधिकारी, (अर्थसंकल्प/रोखशाखा), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) निवड नस्ती, एसडी-६.